दि.१.११.२००५ पूर्वी करार पध्दतीने मानधनावर शिक्षण सेवक/कृषी सेवक/ग्रामसेवक पदावर रुजु होऊन दि.१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर नियमित वेतनश्रेणीत आलेल्या कर्मचा-यांना लागु होणा-या निवृत्तीवेतन योजनेबाबत स्पष्टीकरण.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सेनिवे १००८/प्र.क्र.१६/सेवा ४**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : १९ जुलै, २०११**

वाचा : १) शालेय शिक्षण विभाग अधिसूचना क्रमांक एसएसएन १०९९/(३४०/९९)/माशि-२ दिनांक १३ ऑक्टोबर, २०००,
२) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्रमांक एपिटी १०००/प्र.क्र.२७२/१३ दिनांक ६ जून,२००१
३) शालेय शिक्षण विभागशासन निर्णय, क्रमांक : पीआरई २००२/३३९५/प्राशि-१, दिनांक २७ फेब्रुवारी ,२००३
४) कृषी व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक : कृषिआर२५०२/प्र.क्र.६५६/(१)/१६-अे, दिनांक १७ फेब्रुवारी, २००४
५) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्रमांक एपिटी२००५/प्र.क्र.२२९/आस्था-८दिनांक २० एप्रिल, २००६
६) शासन परिपत्रक वित्त विभाग,क्रमांक : सेनिवे १००८/१६/सेवा-४, दिनांक २६ फेब्रुवारी २००८

## शासन निर्णय

### प्रस्तावना:

शालेय शिक्षण विभाग अधिसूचना क्रमांक एसएसएन १०९९/(३४०/९९)/माशि-२ दिनांक १३ ऑक्टोबर, २०००, शालेय शिक्षण विभाग शासन निर्णय क्रमांक पीआरई २००२/३३९५/प्राशि-१, दिनांक २७ फेब्रुवारी २००३, कृषी व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक कृषिआर२५०२/प्र.क्र.६५६/(१)/१६-अे, दिनांक १७ फेब्रुवारी २००४ आणि ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्रमांक एपिटी १०००/प्र.क्र.२७२/१३ दिनांक ६ जून २००१ व क्र. एपिटी २००५/प्र.क्र.२२९/आस्था-८, दिनांक २० एप्रिल,२००६ अन्वये राज्यात अनुक्रमे शिक्षण सेवक/कृषी सेवक/ग्रामसेवक ही करार पध्दतीने मानधनावर भरण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या निर्णयानुसार राज्यातील मान्यता प्राप्त १०० टक्के शासन अनुदानित प्राथमिक/माध्यमिक शाळा/उच्च माध्यमिक शाळा/कनिष्ठ महाविद्यालये/अध्यापक विद्यालये/सैनिकी शाळा/विद्यानिकेतनात, जिल्हा परिषदांमध्ये, कृषी विभागात दिनांक १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शिक्षण सेवक/ग्रामसेवक/कृषी सेवक या पदावर नियुक्त्या करण्यात आल्या. संबंधित पदांवर नियुक्त झालेले उमेदवार त्यांच्या मानधनावरील सेवा समाधानकारकरित्या पूर्ण करुन जरी दिनांक १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नियमित वेतनश्रेणीत येत असले तरी त्यांची मुळ नियुक्ती दिनांक १ नोव्हेंबर, २००५ पूर्वीची असल्याने व त्यांची मानधनावरील सेवा निवृत्तीवेतनाच्या लाभासाठी ग्राह्य धारण्याचा निर्णय शासनाने घेतला असल्यामुळे त्यांना जुनी निवृत्तीवेतन योजना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

### शासन निर्णय:

शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, संदर्भाधिन क्रमांक १ ते ५ येथे नमूद केलेल्या निर्णयानुसार जे उमेदवार राज्यातील मान्यता प्राप्त १०० टक्के शासन अनुदानित प्राथमिक/माध्यमिक शाळा/उच्च माध्यमिक शाळा/कनिष्ठ महाविद्यालये/अध्यापक विद्यालये/सैनिकी शाळा/विद्यानिकेतने, जिल्हा परिषदा व कृषी विभागात अनुक्रमे शिक्षण सेवक/ग्रामसेवक /कृषी सेवक या पदांवर दि. १ नोव्हेंबर २००५ पूर्वी करार पध्दतीने मानधनावर रुजु झाले

आहेत, ते त्यांच्या मानधनावरील सेवा समाधानकारकरित्या पूर्ण करुन नियमित वेतनश्रेणीत आल्याच्या दिनांकापासून त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू राहीत. तसेच संबंधित कर्मचा-यांनी शिक्षण सेवक /ग्रामसेवक/कृषी सेवक या पदावर मानधनावर केलेली सेवा त्यांच्या निवृत्तीवेतन लाभासाठी ग्राह्य धरण्यात येईल.

२. शासनाने असाही निर्णय घेतला आहे की, संबंधित कर्मचा-यांना ते नियमित वेतनश्रेणीत आल्याच्या दिनांकापासून सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजनेचे सभासद करण्याबाबत आवश्यक कार्यवाही संबंधित कार्यालय प्रमुखांनी करावी. हे कर्मचारी ज्या महिन्यात नियमित वेतनश्रेणीत येईल त्यानंतरच्या महिन्यापासून त्याचे सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजनेचे अंशदान वसुल करण्यात यावे. जर या कर्मचा-यांची नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेची खाती उघडून त्यात त्यांचे अंशदान जमा करण्यात आले असल्यास ती रक्कम तसेच सहाव्या वेतन आयोगाच्या थकबाकीची रक्कम नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या स्तर-२ मध्ये जमा करण्यात आली असल्यास ही सर्व रक्कम त्यांच्या सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजनेच्या खात्यात जमा करण्यात यावी. शासनाचा हिस्सा व व्याजाची रक्कम शासनाकडे जमा करण्यात यावी. ज्या कर्मचा-यांचे नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेमध्ये अंशदान जमा करण्यात आले आहे, त्यांना या जमा होत असलेल्या मासिक अंशदानापेक्षा जास्त रक्कम सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी खात्यामध्ये जमा करावयाची असल्यास जास्त होणारी रक्कम त्या कर्मचा-याकडून वसूल करण्यात यावी. ही वसुली नियमित मासिक अंशदानाच्या वसुलीसोबत करण्यात यावी. ज्या कर्मचा-यांची सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजनेची खाती यापूर्वीच उघडण्यात आली असून अंशदानाची वसुली करण्यात आली आहे, त्यांच्या प्रकरणात ज्या महिन्यापासून सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीच्या वर्गणीची वसुली बंद करण्यात आली आहे, त्या महिन्यापासून ही वसुली करण्यात यावी. अशी कार्यवाही करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखांची राहिल. कर्मचा-यांच्या नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या खात्यातील कर्मचा-यांचे अंशदान त्यांच्या सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी खात्यामध्ये जमा करण्याची व शासनाचे अंशदान व व्याज शासनाकडे जमा करण्याच्या कार्यपध्दतीकरिता कार्यालय प्रमुखांनी राज्य अभिलेख देखभाल अभिकरण /उप राज्य अभिलेख देखभाल अभिकरण यांचेकडे संपर्क साधावा.

३. वरील शासन निर्णय जिल्हा परिषदा तसेच ज्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतनाचे अंशराशीकरण) नियम, १९८४,व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू आहे, अशा मान्यता प्राप्त १०० टक्के शासन अनुदानित प्राथमिक/माध्यमिक शाळा/उच्च माध्यमिक शाळा/कनिष्ठ महाविद्यालये/अध्यापक विद्यालये/सैनिकी शाळा/विद्यानिकेतने, व कृषि विभाग यामध्ये संदर्भाधिन क्रमांक १ ते ५ येथे नमूद केलेल्या निर्णयानुसार नियुक्त झालेल्या शिक्षण सेवक/कृषी सेवक/ग्रामसेवक पदांवरील कर्मचाऱ्यांसाठी योग्य त्या फेरफारासह लागू ठरेल.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०११०७१९३०७०२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**र.आ.नागरगोजे**

**शासनाचे अवर सचिव**

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१००० प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),
उप संचालक, राज्य अभिलेख देखभाल अभिकरण, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ४०० ०३२, (१०० प्रती)
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती),
संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,(१० प्रती)
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,
मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १०प्रती),
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
*विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
*प्रबंधक,, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद
मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.
आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबइ
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,गृहनिर्माण भवन (म्हाडा बिल्डींग), पोट माळा, वांद्रे पूर्व, मुंबई ४०० ०५१.
ग्रं थपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.
कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, 'संकल्प खजिना महाल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०.
मंत्रालयातील सर्व विभाग,
महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१००० प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५प्रती),
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती), संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,
सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),
कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),
कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),
कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड (१० प्रती),
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१२ प्रती),
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),
कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रती),
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

---

*पत्राद्वारे.